भर्तरी आणि पिंगला यांचे सहजीवन अत्यंत आनंदी आणि समाधांनी होते पण तिची सत्वपरीक्षा पाहण्याची दुर्बुद्धी भर्तरीला झाली आणि त्याची परिणीती पिंगलेच्या भयाण मृत्यूत झाली. भर्तरी शिकार करीत असताना वाघाने प्रतिहल्ला केला आणि त्यात तो मृत झाला असा खोटा निरोप भर्तरीनेच आपल्या सेवकामार्फत पिंगलेकडे पाठविला, पिंगलेने त्यावर विश्वास ठेवला आणि ती सती गेली. भर्तरीला ह्याचा प्रचंड पश्चाताप झाला आणि तिच्या सरणावरील रक्षेजवळ तो तहत बारा वर्षे विरहाग्नीत जळत बसून राहिला त्याची ही भ्रमिष्टावस्था सूर्यनारायणालाही पाहवली नाही म्हणून त्यांनी भर्तरीचे गुरु श्रीदत्तात्रेय यांच्याकडे साकडे घातले आणि दात्तात्रेयांनी त्यांना दिलासा दिला की, "हे काम माझा शिष्य मच्छिंद्रनाथावर सोपवणार आहे, तो भर्तरीला माझ्याकडे घेऊन येईल असो! आता ह्यानंतरची रसाळ कथा...

तीर्थ यात्रेच्या हेतूने गर्भाद्री पर्वतावरून गोरक्षनाथ श्रीदत्तगुरु यांच्या गिरनार पर्वतावरील आश्रमात येऊन पोहोचले. त्यांच्या चरणावर मस्तक ठेवून वंदन केले. दत्तगुरूंनी त्यांना हृदयाशी कवटाळले आणि ममतेने त्यांच्या मुखावरून हात फिरवत कुरवाळीत खुशालीची विचारपूस केली. ममतेने विचारपूस झाल्यावर, "गोरक्षा! मच्छिंद्र कुठे आहे? त्याला सोडून तू एकटाच का भ्रमण करीत आहेस?" "गुरुदेव! गर्भाद्री पर्वतावर मच्छिंद्रनाथांनी मुक्काम केला आहे, जप, तप, योग, आराधना नित्यनेमाने सुरु आहे. त्यांची संमती मिळाली म्हणून मी तीर्थाटनासाठी निघालो आहे."

"तू आलास हे बरे झाले. माझे तुझ्याकडे एक खास काम आहे, मला विश्वास आहे तूच हे काम योग्य प्रकारे करू शकशील!" गोरक्ष म्हणाला, "आपण आज्ञा करावी महाराज!" श्री दत्तगुरूंनी त्याला कामगिरी सांगण्यास प्रारंभ केला. "भर्तरीला माझा अनुग्रह प्राप्त झाला आहे. परंतु पत्नी मृत झाल्यामुळे विरहाच्या छायेत तो फसून गेला आहे आणि गेली बारा वर्षे तो स्मशानात बसून राहिला आहे. अन्नपाण्याचा त्याग करून झाडपाला गवत खाऊन 'पिंगला पिंगला' असा घोष करीत आहे. तू तेथे जाऊन त्याच्यावर पसरलेली अज्ञानाची काजळी दूर करावी. युक्तीने, प्रयुक्तीने भर्तरीला शाश्वत आणि अशाश्वत यांची समज द्यावी. त्याला सावध करून नाथ पंथात समाविष्ट करावा. मी त्याला अनुग्रह दिला तेव्हाच संकल्प वचनात बद्ध केले आहे. सर्व वैभव सोडून नाथ पंथात सामील होण्याचे त्यानेही मान्य केले आहे." मग दत्तगुरूंनी भर्तरीची जन्म कहाणी गोरक्षनाथांना ऐकविली. ते ऐकून गोरक्षनाथ म्हणाले, "महाराज! आपली कृपा असल्यानंतर भर्तरी नामक लोखंडाचे सोने होण्यास असा कितीसा वेळ लागणार आहे? आपला कृपा वर्षाव मजवर झाल्याने मी भर्तरी नामक वृक्षाला ज्ञानाची फळे निश्चितच आणू शकतो. आपल्या कृपाछत्रामुळे हे काम सहज आणि सुलभ होणार आहे. तुमच्या इच्छेचा मी कल्पतरू असल्याने भर्तरीचे हलक्या प्रतीचे विचार दूर करणे शक्य आहे. खरंतर त्याचे विचारदारीद्र्यच दूर करण्याचा माझा प्रयत्न असणार आहे. कर्ता, करविता आपणच असल्याने जरूर हे कार्य तडीस जाईल. आता मला निघण्याची आज्ञा द्यावी." असे म्हणत त्यांनी चरण स्पर्श केले आणि आशीर्वाद घेऊन शिघ्र गतीने निघाले. व्यान अस्त्र जपून कपाळी भस्म लावले असतां डोळ्यांची पापणी लावते न लावते तोच ते अवंतिका नगरीच्या स्मशानात पोहोचले.

गोरक्षनाथ दुरूनच भर्तरीला पाहत होते. अस्थीपंजर झालेली हडकुळी काया, मरणासन्न अवस्था, बोलण्याचे त्राण उरले नाही. तरी क्षीण, अस्पष्ट आवाजात पुटपुटत आहे, "हे बरे केले नाहीस रामा! आम्हा प्रेमी जीवांची ताटातूट करून काय

साधलेस? माझ्या प्रिय पिंगलेला का घेऊन गेलास? हे राम! हे पिंगला, पिंगला!!" बारा वर्षाच्या दीर्घ कालावधीनंतरही त्याची विरह भावना पहिल्या दिवसा इतकीच दाहक आहे. नुसता हाडांचा सापळा आणि त्यावर चिकटलेली त्वचा उरली होती. त्याची ती अवस्था पाहून गोरक्षनाथ हळहळले. "अरेरे! युवराजाने पत्नीच्या विरहाचे दुःख फारच लावून घेतले आहे. अशा तीव्र विरहात तडफडणाऱ्या दुःखी जीवाला कितीही बोध केला तरी निष्फळ ठरणार. तो मानणार नाही आणि सुधारणार पण नाही. कोरड्या मौखिक उपदेशाने हे प्रकरण सूटण्यासारखे नाही. परिसाच्या स्पर्शाने खापराचे सुवर्ण होणार नाही, तसे याच्यापुढे कितीही वेळा गीता म्हटली तरी वायाच जाणार. सुगंधी वृक्षांच्या वनात जर मैला टाकला तर त्याचाच दुर्गंध येईल. द्राक्षाचा वेल जर कडुनिंबावर गेला तर निंबवृक्षाचा कडवटपणा त्यांत उतरेल पण कडुनिंब मात्र त्याच्या गोडवा स्वीकारणार नाही. एखादी व्यक्ती वागण्याबोलण्यात चतुर आहे पण जन्मभर दारिद्र्यात असेल तर त्याच्याहातून उद्योग व्यवसाय कसा काय होईल? तसे भर्तरीचे हे प्रकरण अवघड झाले आहे. तरी आता काही तरी युक्तीचातुर्य वापरल्याशिवाय हा काही ताळ्यावर येणार नाही. केवळ उपदेश याच्यासाठी व्यर्थ आहे, कुत्र्याच्या शेपटीसारखे वाकडेच राहील याच्या डोक्यातला भ्रम नाहीसा झाला तरच याला उपरती होईल. प्रभू राम हा राक्षसांचा शत्रू पण त्यांच्यातला विभीषण हा निराळ्या विचारसरणीचा रामभक्त निघाला. बळीराजाला बटू वामन भेटला किंवा पित्याची आज्ञा प्रमाण मानून परशुरामाने मातेचा वध केला, अशाप्रकारे काही वेगळा मार्ग चोखाळल्याशिवाय याला स्वतःचे हित समजणार नाही. खरंतर हा अतिशय बिकट आणि गुंतागुंतीच्या मामला आहे. प्रयत्नांची पराकाष्टा करून श्रीगुरू दत्तत्रेयांचा हा कीर्तिध्वज डौलाने फडफडत ठेवलाच पाहिजे."

काही तरी नामी शक्कल लढवावी लागेल अशा इराद्याने गोरक्षनाथ अवंतिका नगरीच्या कुंभारवाड्यात गेले. एक मडके विकत घेऊन त्याचे 'बाटली' असे नाव ठेवले. चित्रविचित्र रंगात ते मडके सजविले. शहाणपणाच्या नुस्त्या बाता मारणाऱ्या ब्रम्हज्ञानीचे सोंग आणणाऱ्या दांभिक माणसासारखे ते मडके सुंदर दिसू लागले पण अंतर्यामी मात्र ते कच्चे होते. ते सजविलेले मडके घेऊन गोरक्षनाथ साधू महाराजांचा वेष करून स्मशानात गेले. भर्तरीसमोर ठेच लागल्याचे निम्मित करून धरणीवर आपटी घेतली, मूर्च्छा आल्याची बतावणी केली. पुन्हा शुद्धीवर आल्याचे नाटक करून पाहतात, तर मडक्याचे तुकडे तुकडे झाले आहेत. उठून एक एक खापराचा तुकडे गोळा करतांना त्यांनी जोरदार हुंबरडा फोडला. त्यांचा तो आक्रोश स्मशान शांतता चिरीत गेला. "माझी बाटली! माझी बाटली!! माझी माय...भगिनी ss माझी प्रिय बाटली! कशी फुटलीस गं तू?... माझी लाडकी बाटली गेली!! आता कुठे शोधू? आता काय करू? कशी मला सोडून दाही दिशा ओस करून गेली? तुझ्याऐवजी मला मृत्यु आला असतां तर माझ्या देहाचे सार्थक झाले असते. बाटली!! आता तुझ्याशिवाय मी जगणार नाही. बाटली, बाटली SSS! असा गळा काढून गोरक्षनाथ जमीनीवर गडबडा लोळू लागले खापरांच्या तुकड्यांना कवटाळून केविलवाणे रुदन करीत राहिले. साधू महाराजांचा हा आक्रोक्ष पाहून भर्तरी क्षणभर पिंगलेचे दुःख विसरला. गदगदा हसू लागला. त्याला हसतांना पाहून गोरक्षनाथांनी जास्तच गहिवर मांडला. "माझी बाटली कशी फुटली? माझे भाग्यच फुटले, माझी मायेची माऊली, माझ्या भाग्याचा सूर्यास्त झाला. आहारे!! माझे अनमोल धन तस्करांनी लुटले. बाटली प्रिये!! एकदा तरी मला दर्शन दे! मला तोंड दाखव!!" भर्तरी हसत होता. नवलाने हसत होता पण साधु महाराजांचा आकांत जेव्हा वाढता होऊ लागला तेव्हा मात्र तो चक्रावला आणि आश्चर्यचकित होऊन म्हणाला, "ए मुर्खा! कशाला बोंबलतो आहेस? एक पैसा फेकला तर दुसरे मडके येईल. एक फुटले म्हणून एवढा कशाला किंचाळतोस निर्बुद्ध कुठला!!

गोरक्षनाथ म्हणाले, "काय सांगावे नृपती महाराज? आपणांवरूनच माझ्या दुःखाची कल्पना करा. माझ्या आयुष्याचे जोडीदार मडके गेल्यानंतर दुःख होईल नाहीतर काय? अहो! तुमच्या आणि माझ्या दुःखात तिळभरसुद्धा फरक नाही." गोरक्षनाथांची किमया कामी आली, त्यांनी सोडलेला बाण भर्तरीच्या वर्मावर बसला आणि भर्तरी घायाळ झाला आणि म्हणाला, "संन्याशा! माझ्या दुःखाचा संदर्भ घेऊन तुलना केलीस खरी, परंतु तुलना करावयाची अक्कल आहे का तुला? माझ्या प्रिय पिंगलेची आणि या निर्जीव मडक्याची बरोबरी होऊ शकत नाही. माझी पिंगलाराणी सजीव, मानवदेहधारी, सौंदर्याची खाण होती. माझ्या जीवनात विधुल्लतेप्रमाणे लखखकन चमकून ती गेली. ती परत कधी येईल का? ही तुझी असली खापराची मडकी शेकड्यांनी प्राप्त करून देईन. तशी दुसरी पिंगला मिळेल काय?

"नृपाळा! एक नव्हे, लक्षावधी पिंगला आणून देईन! परंतु माझी बाटली मला मिळणार नाही." गोरक्षनाथांच्या या उत्तरावर भर्तरी चवताळलाच म्हणाला. "जोगड्या! तू नाहक वल्गना करीत आहेस. लक्षावधी पिंगला देईन म्हणे! चल दाखव बरे पिंगलेला आणून. मी तर तुला शेकडो मडकी येथे बसून देईन. तू मला माझी पिंगला दाखव, बघू दे तरी तुझा चमत्कार. काही तरी बडबड करून मुखातून वाफा घालवीत आहेस. तुझ्या मडक्याप्रमाणे तुझी वाणीसुद्धा कच्ची आणि ढिसाळ आहे. मृगजळाने तहान भागात नाही. गरजणारे मेघ बरसत नाहीत. काजव्याचा प्रकाशाने अंधःकार नष्ट होत नाही त्याप्रमाणे तू नुसता बढाईघोर दिसतोस. कृती मात्र शून्य असणार. योगीराज! साधुत्वाला लांछनास्पद असणारा, असला फोलपणा सोडून द्यावा." आपली निर्भत्सना ऐकल्यानंतर गोरक्षनाथ म्हणाले, "नरेंद्रा! जर खरोखरी लक्षावधी पिंगला निर्माण केल्या तर काय द्याल?"

"मला पिंगला डोळ्यांनी दाखविलीस तर तू मागशील ते देईन. राजवैभवासह तुझी कुठलीही मनोकामना पूर्ण करीन." गोराक्षांनी त्याला विचारले, 'तुझ्या या वचनाला साक्षीदार कोण आहे?"

"पंचमहाभूते आणि सर्वव्यापी ईश्वर साक्षी आहे. मी जर बोलल्याप्रमाणे वागलो नाही तर माझे पूर्वज रौख नरकात जातील, माझे हे वचन आहे आणि तू तपस्वी असुन वचनाला जागला नाहीस तर तू हजार जन्म नर्क भोगशील."

ठीक आहे! मला मंजूर आहे." असे म्हणून गोरक्षनाथांनी पिंगलेचे नाव घेत भस्मचिमुटीवर कामिनी अस्त्राचा जप करून, भस्म हवेत भिरकावले. क्षणार्धात कोटी कोटी पिंगला निर्माण झाल्या. चितेमध्ये भस्म झालेली मुख्य पिंगला आणि तिच्या असंख्य प्रतिमां चौफेर आसमंतात दिसू लागल्या. मुख्य पिंगला भर्तरीसमोर हात जोडून उभी राहिली. आपण जागे आहोत का स्वप्नांत हेच भर्तरीला समजेना, त्याने पिंगलेला जवळ बसवून घेतले. ही जादुगिरी आहे की मला भास होत आहे, याची खात्री करण्यासाठी भर्तरी पिंगलेला प्रापंचिक जीवनातील खाणाखुणा आणि घटनेच्या आठवणी विचारू लागला. तिने सर्व खाणाखुणा अचूक सांगितल्या. ही तर खरोखरीची पिंगला असल्याची युवराजांची खात्री झाली. पिंगला हात जोडून भर्तरीला म्हणाली, "महाराज! माझ्या विरहाचे शल्य किती दिवस हृदयात वागविणार आहात? रक्तमांसाच्या नश्वर देहासाठी किती दिवस शोक करीत राहणार? तुमच्या प्रेमाने वेडी होऊन मी अग्नी प्रवेश केला पण त्याची जबरी शिक्षा तुम्ही भोगत आहात, प्राणेश्वरा, आज गोरक्षनाथांनी तुमच्या हट्टासाठी मला अंनत प्रतिमांसह पुन्हा प्रकट केले. परंतु यानंतर सुद्धा तुम्हां आम्हाला मृत्यु आहेच. तो चुकवायचा असेल तर माझी आसक्ती सोडा आणि मोक्षाचा मार्ग धरावा. माझ्याबरोबर तुम्ही पुन्हा जरी संसार मांडला तरी मोक्षमुक्तीचा खजिना प्राप्त होणार नाही. मी पिंगला, तुमची पत्नी या नात्याने पत्नीधर्म निभावून माझे हित साध्य केले. प्राणेश्वरा, प्रज्ञावंता! आता तुमचे

हित तुम्ही करावे. माझ्यासाठी व्यर्थ कष्टी होऊ नये. मी तुमच्या पायाची दासी असल्याने अधिक काय सांगू?" असे म्हणून पिंगला निवांतपणी भर्तरीजवळ बसली. भर्तरीचा स्वतःच्या डोळ्यांवर आणि कानावर विश्वास बसत नव्हता आणि सत्यही नाकारता येत नव्हते. बारा वर्षांनी डोळे भरून पिंगला पहिली. जशी पूर्वी होती तशीच होती. त्याला फार विस्मय वाटला. स्वतःचा वेडेपणा कळून आला आणि त्याने पटकन गोरक्षनाथांना दंडवत घातला. गोरक्षनाथांनी त्याला चरण स्पर्श करू न देता, हाताला धरून उठवीत म्हणाले, "महाराज भर्तरीनाथ! आपण मला गुरुस्थानी आहात. माझे गुरु प्रतापी मच्छिंद्रनाथ श्रीदत्तात्रेयांचे शिष्य आहेत. आपण सुद्धा श्रीदत्तांचे शिष्य असल्याने माझ्या गुरूंचे गुरुबंधू आहात. या अलौकिक नात्याने आपण मला गुरुस्थानी आहात. सदैव वंदनीय आहात. मी आपणाला वंदन केले तर चालेल पण आपण मला चरण स्पर्श करणे हे सर्वस्वी अयोग्य आहे. माझा आपणाला साष्टांग प्रणिपात आहे. तरी हे सद्‌गुरू भ्रांता गुरुराया! आपली काय इच्छा आहे? पिंगला सोबत राजवैभवी संसारसुख हवे की वैराग्यशाली योगवैभव हवे? एक नश्वर आहे, तर दुसरे अविनाशी आहे. आपण ज्याची इच्छा कराल ते आपणास प्राप्त होईल."

गोरक्षनाथ! बारा वर्षे स्मशानात बसून पिंगलेचा धावा केला, परंतु पिंगलेचे नखसुद्धा दृष्टीस पडले नाही. आपण मात्र योगबलाने शेकडो पिंगला प्रत्यक्षात उभ्या केल्यात. तिच गत राजवैभवाची होईल. यापूर्वीच मायेच्या मोहात फसून श्रीगुरुंना सबबी सांगत सुटका करून घेतली होती. त्याची परिणीती अपार दुःख प्राप्तीत झाली. संसार भवतापात पोळून निघालो. आता श्रीगुरू चरणांची ओढ लागली आहे. चातकासारखा अधीर होऊन त्यांच्या भेटीची वाट पाहतो आहे. कृपाघना! आपण माझ्या तृष्णेची पूर्तता करावी. आता मला संसार वैभव, राजवैभव क्षुल्लक वाटत आहेत, योगधर्मा पुढे ते कवडीमोल आहेत. आपण धन्य आहात. कुरुक्षेत्रावर श्रीकृष्णाने अर्जुनाला विरारूप दाखवून त्याची भ्रांत दूर केली, तसे आपण मला पिंगला दर्शन देऊन माझा भ्रम दूर केला आहे. आता मी संसार भ्रमात फसणार नाही. योगमार्गाचा स्वीकार करून विद्याभ्यास करायचा दृढ निश्चय करीत आहे. कृपा करून मला तातडीने श्रीगुरुंचे दर्शन घडवावे." भर्तरी पश्चातापाने दुग्ध होऊन आपले मन मोकळे करीत होता. गोरक्षनाथांनी पुन्हा चाचपणी करण्याच्या हेतूने विचारले, "गुरु भर्तरीनाथा! पिंगलेच्या प्राप्तीसाठी आपण एवढ्या यातना भोगल्या आहेत त्या प्राप्त करून त्यांना भोगून आपले चित्त संतुष्ट करावे."

"गोरक्षनाथा! एका पिंगलेसाठी एवढे दुःख भोगले आहे. मग लक्षावधी पिंगलांच्या दुःखाचा हिशोब कुणी करावा? चंद्रसूर्य असे पर्यंत सुद्धा त्याचा निपटारा होणार नाही. एका इंगळीच्या दंशाने इतक्या वेदना झाल्या, तर लक्षावधी इंगळया डसल्यावर काय होईल त्याची कल्पना सुद्धा करता येणे अशक्य आहे. नको, नको महाराज या पिंगलांना अदृश्य करा. तिच्याही आत्म्याला माझ्यामुळे दुःख नको. मी दिलेल्या वचनाप्रमाणे राज्यवैभव आपणास दिले आहे. आपण ते खुशाल भोगावे. मला माझ्या गुरु स्वामींचे चरणदर्शन करवून उपकृत करावे."

"जशी आज्ञा!" असे म्हणून गोरक्षनाथांनी पिंगलेला अदृश्य करून स्वस्थानी पाठविले आणि भर्तरीचा हात धरून त्यांस राजवाड्यात आणले. बारा वर्षांच्या स्मशानातल्या वास्तवानंतर भर्तरी महाराज राजवाड्यात आल्याने सर्वजण आनंदीत झाले. विक्रम राजाने तर गोरक्षनाथांच्या चरणांवर लोळणच घेतली. त्यांनी अशक्य ते शक्य करून दाखविले होते. त्यांना सुवर्णसिंहासनावर बसवून त्यांचे षोडशोपचारे पूजन केले. हात जोडून विचारले, "महाराज! माझा प्रिय भाऊ भर्तरी, पत्नी विरहाच्या दुःखाने स्मशान सोडण्यास तयार नसताना आपण कोणत्या उपायांनी त्याला भानावर आणलेत? कृपया

आम्हाला सविस्तर सांगावे." मग गोरक्षनाथांनी संपूर्ण स्मशान कथा ऐकविली आणि भर्तरीला वैराग्य प्राप्ती झाल्याचे सांगितले. तसेच पुढील कार्याचा बेत सुद्धा कथन केला. हे ऐकून विक्रम राजा संतुष्ट झाला. त्याने मोठ्या मर्मज्ञपणे आणि चतुराईने विनंती केली की, "महाराज! आपण बरीच युक्तिपूर्वक मेहनत घेतली आहे, तरी आमच्या विनंतीला मान देऊन आपण इथे सहा महिने वास्तव्य करावे. माझ्या प्राणप्रिय भावाने गेल्या बारा वर्षांत अन्नाचा घास देखील खाल्लेला नाही. देह कृश झाला असून डोळयांत प्राण उरला आहे. त्याला सकस अन्न भरवून धष्टपुष्ट करण्याची इच्छा आहे. तरी माझे एवढे ऐकावे." पण गोरक्षनाथ त्यासाठी राजी झाले नाहीत. ते म्हणाले, "विक्रमा! मी आपल्या भावना समजू शकतो परंतु जो पर्यंत भर्तरीची विरक्ती आणि निश्चय तप्त आहे, तोपर्यंत त्यांना योग्य मार्गाला लावले पाहिजे. येथे सहा महिने कालावधीच्या वास्तव्यात त्यांच्या निश्चय डळमळीत झाला तर? म्हणून वास्तव्याचा विचार मला योग्य वाटत नाही." यावर विक्रम राजा निरुत्तर झाला पण हे वृत्त भर्तरीच्या राणीवंशात समजल्यावर त्याचे पडसाद निराळेच निघाले. त्याच्या राण्या दुःखाने विव्हळ होऊन शोक करू लागल्या. गोरक्षनाथाच भर्तरीला फूस लावून नेत आहेत असे समजून त्यांना शिव्याशाप देण्यास सुरवात झाली. नाना तऱ्हेच्या अभद्र भाषेत त्या म्हणू लागल्या, "मेला गोरक्ष! त्याचे वाटोळे होईल. स्वामींना दूरदेशी नेण्यासाठी फूस लावून बहकावितो आहे. जळो त्याचे तोंड. त्याची जीभ झडो. आमचे सौभाग्य घेऊन जातो आहे. नरकात जाईल मेला!" असा तळतळाट करीत रडारड सुरु झाली.

विक्रम राजाच्या समाधानासाठी गोरक्षनाथ अवंतिका नगरीत तीन दिवस राहिले. मग विक्रमाचा निरोप घेऊन भर्तरीसह निघाले. विक्रमाने गोरक्षनाथांना वंदन केले. प्राणप्रिय बंधूला कडकडून आलिंगन देताना मात्र ते गहिवरले आणि नगरीबाहेर नेण्यासाठी त्यांच्यासह निघाले पण भर्तरीच्या अंतःपुरात मात्र एकच आकांत उसळला. त्याच्या स्त्रियां धरणीवर अंग झोकून गडबडा लोळू लागल्या.

गोरक्षनाथ भर्तरी आणि विक्रम राजासह नगरीबाहेर येऊन पोहोचले आहेत. गोरक्षनाथांनी भर्तरीला विचारले, "भर्तरी महाराज! राजवैभव आणि कामिनींसाठी मनात चलबिचल होत नाही ना? मनाची द्विधा अवस्था असल्यास स्पष्टपणे सांगावे. मनाचा कोंडमारा करून घेऊ नका. आपणावर कोणत्याही प्रकारची सक्ती लादली जाणार नाही." भर्तरीचा निग्रह आजमावण्यासाठी गोरक्षनाथांची चाचपणी चालली होती. भर्तरी उत्तरतो, "गोरक्षनाथ द्विधा मनःस्थिती मुळीच नाही. योगचरणाकडे मन धाव घेत आहे. राजवैभव, सोनेनाणे, संपत्ती आणि कामिनी यांची आता वमनपेक्षाही जास्त किळस येते आहे. आता फक्त श्रीदत्तगुरूंचा ध्यास लागला आहे. मग गोरक्षनाथांनी भर्तरीला नाथपंथीय वेष परिधान करावयास सांगितले. हातात भिक्षा झोळी दिली आणि म्हणाले, "वैभव आणि कामिनीमायेची वमनापेक्षा जास्त किळस येते. असं म्हणता ना? मग आम्हाला त्याची प्रचीती दाखवा. ही भिक्षा झोळी घेऊन अंतःपुरात जावे. आपल्या बाराशे कामिनींना परस्त्रीया मानून त्यांच्याकडूनच भिक्षा मागून यावे."

एवढेच ना? अवश्य भिक्षा मागून आणतो. त्यात अवघड असे काहीच नाही." असे म्हणून भर्तरी ठाम निग्रहाने अंतःपुरात आला आणि खड्या आवाजात हाक घातली, 'अल्लख निरंजन! भिक्षा वाढा माई!" सिंगी, सारंगी वाजवीत प्रत्येकीच्या महालासमोर फिरू लागला. आधीच शोकमग्न असलेल्या त्या स्त्रियांच्या जखमेवर मीठ चोळल्याप्रमाणे त्यांना वेदना होऊन व्याकूळपणे त्या आक्रांदल्या. रायाचा भिक्षेकऱ्याचा अवतार पाहून त्यांच्या दुःखाला पारावार राहिला नाही. काहींनी धरणीवर अंग झोकून दिले. स्वतःचे केस ओरबाडून तोडू लागल्या. मातीचे तोबरे तोंडात कोंबू लागल्या.

धरणीवर मस्तक आपटू लागल्या. कित्येकींची कपाळे रक्तबंबाळ झाली. छाती पिटून घेत होत्या. शब्दात वर्णन करता येणार नाही. अशा आक्रोशाने राजमहालाच्या भिंती थरारल्या. त्यांचा करूण विलाप काही बंद होईना. "शंभर जन्म घेतले तरी असा पती मिळणे शक्य नाही. रायाची ममता मातेपेक्षाही अधिकच वाटायची. विधात्या! काय हे आमच्या भाग्यात लिहिलेस? पती जिवंत असतानाही विधवेचे जिणे जगावे लागणार आहे. वासराला सोडून गोमात कधी राहत नाही, तसा आमचा प्रेमळ पती आम्हाला सोडून राहायचा नाही. आमचा उतरलेला चिंतामग्न चेहरा पाहताच विचारपूस करून मनातली इच्छा पूर्ण करीत असे. आई मुलीला जसा लळा लावते तशीच आम्हावर त्याची माया होती. असा मायाळू पती किती निष्ठूर झाला आहे. पती आमचा प्राणच; तोच निघून गेला तर आमचे जगणे निष्प्राण, प्रेतवत होईल, निर्जीव होईल आयुष्य अर्थहिन होईल." असे म्हणत दीनवाण्या होऊन करूणा भाकत, शक्तिहीन होऊन रायाच्या पायावर लोळण घालून विनवीत आहेत, "महाराज! आपल्यासारखा वैभवशाली राज्याच्या राजाने भिक्षा मागणे शोभत नाही, आपण धरणीवर कामदेवाप्रमाणे दिसत होतात. आता तुमचा देह कृश झाला आहे. काय हाल करून घेतले आहेत. इंद्रपेक्षाही वैभवशाली असताना भिक मागण्याचे अभद्र कृत्य तुम्ही करत आहात. महाराज! जरा विचार करा." असं विलाप करीत स्वदेहाचेही हाल करीत होत्या. त्या सार्वजणींनी भर्तरीला गराडा घातला आणि रडत भेकत म्हणाल्या, "प्राणनाथा! आम्हाला सोडून जाऊ नका. तुमचा मुखचंद्र पाहून आम्ही सुख मानत होतो. तुम्ही जर कायमचे गेलात तर आम्ही कोणाच्या तोंडाकडे पाहावे? जाण्यापूर्वी आमचा प्राण घेऊन आम्हाला मुक्ती द्या, आणि मग खुशालीने जेथे जावयाचे तेथे जा." त्यांचा निर्वाणीचा इशारा ऐकताच भर्तरी संतापला आणि कुबडी उगारून त्यांच्या अंगावर धवून गेला, भोवती केलेल्या घेराव्यातून बाहेर आला. गोरक्षनाथ गुप्तरूपाने हा मायेचा तमाशा निरखत होते. भर्तरी पुनश्च गावाबाहेर येऊन गोरक्षनाथांना भेटला. उभयतांना निरोप देऊन विक्रम राजा अवंतिका नगरीत परतला. विक्रम राजा प्रथम अंतःपुरात आला, भर्तरीच्या सर्व स्त्रियांना माय, बहिण, कन्येसमान मानून बोध केला आणि त्यांची समजूत काढली. भर्तरी आणि गोरक्ष अर्धा कोस अंतर पार करून गेले. कृशकायेच्या भर्तरींना चालणे कष्टदायक होऊ लागले. अति अशक्तपणा आल्याने थकवा आला. गोराक्षांनी व्यान अस्त्र जपून उभयतांच्या माथ्यावर भस्मचिमुट लावताच, काही क्षणांत ते गिरनार पर्वतावरील श्रीदत्तगुरूंच्या आश्रमात आले. उभयतांनी श्रीगुरू दत्तात्रेयांचे चरणवंदन केले. दोघांनाही प्रेमाने केवेत घेऊन श्री दत्त म्हणाले, 'गोरक्षा! भर्तरीचे कल्याण करण्यासाठी मी तुला पुष्कळच श्रम करावयास लावले." त्याचप्रमाणे भर्तरीला कुरवाळीत म्हणाले, "द्रुमिल नारायण भर्तरीनाथ! फार क्लेश भोगलेस वत्सा पण चित्तवृत्ती योग्य होण्यासाठी ते आवश्यकही होते." लहान बालकाप्रमाणे भर्तरीनाथ श्रीदत्तगुरूंच्या खुशीत बिलगले आहेत.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने क्षयरोगादी त्रिविध ताप दूर होतील.